# नित्यनेमावली

१ ली आवृत्ती १९११

# विषयानुक्रमणिका.



# सूचि.

| पद्यारंभ. | पृष्ठ. |
|---|---|



विडा.



| पद्यारंभ. | पृष्ठ. |
|---|---|



आरत्या.



शेजारती.



अष्टकें.



धांवा.



पाळणे.

# प्रस्तावना.

प्रस्तुत पुस्तकांत श्रीभाऊरावमहाराज उमदीकर यांच्या सांप्रदायांत प्रचलित असलेला भजनक्रम दिला आहे. प्रथम रात्रौ ह्मणणेचें भजन व नंतर काकड-आरती अशी योजना केली आहे. काकडआरतीनंतर “ पंचसमासी ” नामक एक पांच समासांचें प्रकरण त्यांच्या शिष्यांपैकीं गणपति पवार नामक एका सोळा वर्षांच्या मुलानें केलेलें दिलें आहे. नंतर त्यांच्या शिष्य-वर्गांपैकीं मंडळींनीं केलेलीं चारच पदें दिलीं आहेत. प्रस्तुत पुस्तक सांप्रदायांतील मंडळीसच विशेषेंकरून उपयोगी पडण्याजोगें आहे. बहुजनसमाजास सर्व दृष्टींनीं पसंत पडेल अशा प्रकारचें एक विस्तृत पुस्तक कर-ण्याचा विचार होता; परंतु कांहीं कारणामुळें तो लांब-णीवर टाकणें भाग पडलें. सदर पुस्तक प्रसिद्ध करण्यास

योग जुळून आल्यास त्यांत पुष्कळ चांगला मजकूर येण्याजोगा आहे. प्रस्तुत पुस्तकाची किंमत थोडी ठेवणें जरूर असल्यानें भजनांतील पुष्कळ आरत्या, अष्टकें, भारुडें गाळावीं लागलीं आहेत. हा सर्व मजकूर व शिवाय महाराजांच्या संग्रहीं असलेल्या असंख्य आनुभविक पदांचा व अभंगांचा साठा व तसेंच महाराजांनीं पाठविलेलीं कांहीं महत्त्वाचीं पत्रें, तसेंच संप्रदायाचा समूळ इतिहास, महाराजांचें विस्तृत चरित्र इत्यादि मजकूर पुढील पुस्तकावर लोटणें जरूर आहे. त्यांच्या शिष्यांनीं केलेलीं पुष्कळच पदें आहेत. तीं सर्व पुढील पुस्तकांतच घालणें जरूर आहे. हा योग केव्हां जुळून येईल तेव्हां येवो! तूर्त पूर्णचंद्राचा आल्हाद चंद्रकलेतच मानून घेणें भाग आहे.

श्री भाऊराव महाराज यांची परंपरा रेवणनाथ (ज्यांस रेवणसिद्ध असेंहि म्हणतात)

यांपासून आली आहे. नवनाथांचीं नांवें एका संस्कृत श्लोकांत दिलीं आहेत. तो श्लोक असा :-

गोरक्षजालंधरचर्पटाश्च ।
अडभंगकानीफमछिंदराद्याः ॥
चौरंगिरेवाण च भर्तृसंज्ञा ।
भूम्यां बभूवुर्नवनाथसिद्धाः ॥४॥

संस्कृतज्ञ लोकांस या श्लोकांत कांहीं दोष आढळतील; परंतु श्लोककर्त्याचा उद्देश नवनाथांचीं नांवें एकत्र ग्रथित करणें एवढाच असल्यानें त्यांतील दोष पाहणें इष्ट होणार नाहीं. असो. 'नवनाथभक्तिसार' नामक ग्रंथांत रेवणसिद्धांचें चरित्र ३४, ३५, ३६, या अध्यायांत दिलें आहे. रेवणनाथ हें नांव पडण्याचें कारण असें दिलें आहे :-

पूर्वी अठ्ठ्यायशीं सहस्र ऋषी । झाले आहेत विधिवीर्यासीं । त्याच समर्थी रेत महीसीं । रेवातीरीं पडियेलें ॥१७॥ रेवातीरीं तेंही रेवंत । रेत पडलें अकस्मात । चमस नारायण संचार करोनि त्यांत । देहधारी मिरवला ॥१८॥

रेवणनाथ कृषिकर्म करीत असतां त्यास श्रीदत्तांची भेट कशी झाली, दत्तांनीं पूर्ण अनुग्रह न करतां केवळ महिमासिद्धि कशी दिली, त्या सिद्धीच्या योगानें रेवणनाथांनीं चमत्कार कसे केले, पुढें मत्स्येंद्रनाथांचें तेथें आगमन होऊन त्यांस आठही सिद्धि वश असल्यानें रेवणनाथांची मानहानि कशी झाली, दत्तांचा पूर्ण अनुग्रह मिळविण्याबद्दल त्यांनीं नंतर कशी खटपट केली. मत्स्येंद्रनाथांनीं गिरनारीं जाऊन श्रीदत्तांस तेथें कसें आणलें; नंतर दत्तांनीं रेवणनाथांस आत्मज्ञान-पारंगत करून सर्व विद्या व सर्व कला कशा मिळवून दिल्या, याचें सुरस वर्णन "नवनाथभक्तिसार" अध्याय ३५ यांत दिलें आहे तें जिज्ञासूंनीं पहावें.

या पुढचा रेवणनाथचरित्राचा उपयोगी भाग "सिद्धांतसार" नामक ग्रंथांत सांपडतो. रेवणनाथांचे मरुळसिद्ध नामें अनुगृहीत होते. करवीरक्षेत्रीं सिद्ध पुरुषांशीं विरोध करणारी माई या नांवाची एक स्त्री होती. तिनें आपलेपणानें कित्येक सिद्धांस बंदि-

शाळेंत घातलें होतें. मरुळसिद्ध अचानक तेथें प्राप्त होऊन त्यांनीं तिचा पण जिंकला, पण माईची पूर्ण "भ्रांति फेडण्याबद्दल" त्यांस गुरूची आज्ञा नसल्यानें ते गुरूकडे गेले व त्यांस करवीरास येण्याबद्दल प्रार्थना केली. रेवणनाथांनीं विनंति मान्य केली; वाटेंत रेणागिरीपर्वतावर विश्रांति घेतली, व करवीरास येऊन माईचें सर्व विष प्राशन करून तिचा पण हरण केला व ती शरण आल्यावरून तिची एक किनरी बनविली. ती ते नेहमीं वाजवीत असत असें म्हणतात.

याप्रमाणें माईचें मर्दन केलें म्हणून रेवणसिद्ध हे त्या प्रांतीं 'काडसिद्ध' या नांवानें प्रसिद्ध झाले. "कानडींत 'काड' धातूचा अर्थ त्रास देणें, छळणें असा आहे. 'माईगे काडिदा' म्हणजे माईस छळलें ह्मणून त्यास 'काडासिद्ध' असें नांव पडलें" ( सन्मार्गवैभव ). 'काडसिद्ध' या शब्दाचा अर्थ कोणी 'काड' म्हणजे वनांत राहून सिद्धदशेप्रत पावलेले असा करितात. 'सन्मार्गवैभव' कर्त्यांनीं असें ह्मटलें

आहे कीं, रेवणसिद्ध व काडसिद्ध यांचा उल्लेख स्कंद-पुराणांत शिवपार्वतीसंवादांत आहे. प्रस्तुत लेखकानें तो ग्रंथ अद्याप पाहिला नसल्यानें त्याबद्दल विशेष कांहींच लिहितां येत नाहीं. रेवणसिद्धांपासून मरुळसिद्ध व मरुळसिद्धांपासून काडसिद्ध झाले असें त्यांत वर्णन आहे असें म्हणतात. कांहींही असो, रेवणसिद्धच काड-सिद्ध या नांवानें प्रसिद्ध झाले असोत, किंवा रेवण-सिद्धांपासून काडसिद्धांची उत्पत्ति झाली असो. एवढें निश्चित आहे कीं, रेवणसिद्ध व काडसिद्ध या उभय-तांत परस्पर निकट संबंध आहे. यांच्या परस्परसंबं-धाचा पूर्ण इतिहास पुढील पुस्तकावर टाकणें जरूर आहे.

वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत असें येईल कीं, मत्स्येंद्रनाथ व रेवणनाथ यांचाही परस्पर अत्यंत नि-कट संबंध आहे. मत्स्येंद्रनाथांच्या सांप्रदायांत गोरक्षनाथ, गैनीनाथ, निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई, वि-सोबा खेचर, नामदेव इत्यादि प्रसिद्ध संत होऊन गेल्याचें

वाचकांस माहीत असेलच. त्याचप्रमाणें रेवणनाथांच्या सांप्रदायांत काडासिद्ध, निंबरगीमहाराज वगैरे साधूसंत होऊन गेले आहेत. श्रीकाडासिद्धांचें स्थान करवीर-नजिक सिद्धगिरी नांवाचा डोंगर आहे तेथें आहे. श्रीकाडासिद्ध यांस सर्व लिंगायत लोक शंकरांश मानून ते अयोनिसंभव होते असेंही मानितात; व त्यांच्या धर्माचा मुख्य उपदेशक जो बसव त्यापेक्षांही ते काड-सिद्धांस जास्त मान देतात. कारण बसव हे फक्त नंदीचे अवतार असून श्रीकाडासिद्ध हे प्रत्यक्ष शंकराचे अवतार आहेत. लिंगायतधर्मानुयायी पुष्कळ लोक आत्मज्ञानी होऊन गेले; हें त्यांच्या पुष्कळ संतांनीं के-लेल्या प्रेमळ आणि अनुभविक पदांवरून स्पष्ट होतें. ह्या पदांची एक कुसुमावलि करण्याचें आमच्या एका मित्रानें ठरविलें आहे; व त्याप्रमाणें ते त्या कार्यासही लागले आहेत. आत्मज्ञानी लोक कोणत्याही धर्मांत अथवा धर्मशाखेंत असोत; ते लिंगायत असोत, वैष्णव असोत, दत्तोपासक असोत किंवा रामोपासक असोत; आत्म-

ज्ञान झाल्यावरोवर ते एकमेकांशीं कशा सलोख्यानें वागतात याचें एक उत्कृष्ट उदाहरण श्रीज्ञानदेवमहाराज यांच्या गाथेंत सांपडण्याजोगें आहे:—

ॐ नमो शिवा आदि । कावडि घेतली खांदीं । मिळाली संतमांदी । त्याचे रज-रेणु वंदी ॥ ध्रु० ॥ गुरुलिंग जंगम । त्यानें दाविला आगम । आधिव्याधि झाली सम । तेणें विश्राम पावलोंरे ॥ १ ॥ जवळी असतां जगज्जीवन । कां धांडो-ळिसी वन । एकाग्र करी मन । तेणें होईल समाधानरे ॥ २ ॥ देहभाव जेथें विरे । तें साधन दिधलें पुरे । बापरखुमा-देविवरे । विठ्ठलुरे विठ्ठलुरे विठ्ठलुरे ॥३॥

श्रीज्ञानदेवमहाराज यांचे वेळीं सुद्धां आत्मज्ञानी जंगम होते हें यावरून उत्कृष्ट रीतीनें सिद्ध होतें; व त्यांची योग्यताही ज्ञानदेवमहाराजांनीं कबूल केली आहे. असो.

वर निर्दिष्ट केलेले श्रीकाडसिद्ध यांचेच नारायणराव-महाराज ( जे निंबरगीमहाराज या नांवानेंही प्रसिद्ध आहेत ) अनुगृहीत होत. त्यांचें एक विस्तृत चरित्र " सन्मार्गवैभव " या नांवानें चिमडचे रामभाऊमहाराज असतांना त्यांच्या एका शिष्यानें छापून प्रसिद्ध केलें आहे. त्याप्रमाणें त्यांनीं सहज केलेला हितोपदेश ' महाराजरवर वचन ' या नांवानें बाबाचार्य काव्य, विजापूर, यांनीं छापून प्रसिद्ध केला आहे. निंबरगी-महाराजांनीं स्वतः केलेलीं कांहीं कानडी पदें त्या पुस्तकाच्या शेवटीं जोडलीं आहेत. निंबरगीमहाराजांचा जन्म लिंगायत नीलवाणी जातींत शके १७१२ त झाला व त्यांचें निर्याण शके १८०७ चैत्र शुद्ध १२ स झालें. हे आपल्या पंचविसाव्या वर्षीं सिद्धगिरीस गेले असतां ( पं. स. १–२२, २३ ) त्यांस तेथें जंगम-रूपानें काडसिद्धांनीं अनुग्रह केला. पुढें घरीं परत आल्यावर त्यांनीं ६ वर्षेंपर्यंत साधनाची टंगळमंगळ चालविली. नंतर काडसिद्धांनीं त्यांस पुनः दर्शन देऊन

आपलें अलौकिक सामर्थ्य दाखविलें व साधन करण्याविषयीं पुनः आठवण दिली. नंतर नारायणरावांनीं ३६ वर्षें अश्रांत साधन करून सिद्धगिरीस जाऊन सद्गुरूंची भेट घेतली व जगदुद्धाराची परवानगी मिळविली; व पुढें २८ वर्षें जगदुद्धाराचें काम करून त्यांनीं निंबरगी येथें देह ठेविला. त्यांच्या समाधीवर देऊळ बांधण्याचें काम हल्लीं निंबरगी येथें चाललें आहे.

निंबरगीमहाराजांचें अल्प चरित्र पंचसमासी समास १ यांत दिलें आहे तें जिज्ञासूंनीं पहावें. निंबरगीमहाराज हे एक अलौकिक पुरुष होऊन गेले. स्वामी विवेकानंदांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहेः—

“The greatest men in the world have passed away unknown. The Buddhas and the Christs that we know are but second-rate heroes in comparison with the greatest men of whom the world knows nothing. Silently they live, and silently they pass away; and in time, their thoughts find expres-

sion in Buddhas and Christs, and it is these latter that become known to us."—*On Freedom.* अशा माहात्म्यांपैकीं नारायणरावमहाराज हे होते. त्यांची दासबोधावर व तुकारामाच्या अभंगांवर अत्यंत श्रद्धा होती. श्रीकाडसिद्धांच्या अनुग्रहानें व आपल्या साधनबलानें त्यांनीं आत्मज्ञान पूर्ण अनुभविलें होतें. त्यांनीं आपला मार्ग अत्यंत गुप्त ठेविला होता; त्यामुळें त्यांच्या कांहीं जिवलग मित्रांसही त्यांची योग्यता कळली नव्हती. " गुप्त आहे उदंड धन । काय जाणती सेवक जन । त्यांस आहे तें ज्ञान । बाह्याकाराचें ॥ " या न्यायानें इतर जनांस त्यांची योग्यता कशी कळावी ? आत्मज्ञान जीर्ण झालें होतें त्याचा त्यांनीं जीर्णोद्धार केला. व त्यांनीं लाविलेला आत्मज्ञानवृक्ष वाढून पुढें त्यांस जशीं फळें येतील तशी त्यांची योग्यताही प्रकट होईल.

नारायणरावमहाराज यांच्या शिष्यांपैकीं मुख्य म्हटले म्हणजे रघुनाथप्रिय साधु हे होत. हे बालब्रह्म-

चारी पुरुष होते. काशीयात्रा करून रामेश्वरास जातांना निंवरगीनाजिक सोनगी गांवीं राहिले असतां त्यांच्या तपोबलानें त्यांनीं पुष्कळ चमत्कार केले; व त्यांची पुष्कळ प्रसिद्धि झाली. नंतर निंवरगीमहाराज तेथें येऊन त्यांनीं " तुमचा मार्ग फक्त पुण्यसंचयाचा आहे, आत्मज्ञानाचा नव्हे " अशी त्यांची खात्री करून दिली; आणि रघुनाथप्रिय साधु शरण आल्यानें त्यां-वर अनुग्रह केला. ( पं. स. १–३०,३१. ) नंतर साधुबुवा निंवरगीहून जवळच असलेल्या उमदीस जाऊन राहिले; व बारा वर्षें साधन करून पुष्कळ ज्ञान मिळविलें. तदनंतर त्यांनीं गुर्वाज्ञेनें पुष्कळ लोकांवर अनुग्रह केला, व नंतर ते चिमडास येऊन राहिले. तेथें त्यांनीं शके १८०१ चैत्र शुद्ध ३ स देह ठेविला. त्यांचें ज्या जागीं दहन केलें तेथें एक मोठा वृक्ष लाविला आहे; व तेथील ' तापनाशी ' तीर्थांत त्यांच्या नांवें त्यांचे शिष्य रामभाऊमहाराज यांनीं एक बाण स्थापिला आहे.

रघुनाथप्रिय साधु उमदीस असतांना त्यांनीं भाऊराव-महाराज यांचें अंतःकरण निर्गुण उपासनेकडे कसें ओढून घेतलें, त्यांस ते निंबरगीमहाराजाकडे कसें घेऊन गेले, व गुर्वाज्ञा झाल्यानें स्वतःच भाऊरावांवर कसा अनुग्रह केला ( पं. स. २–१७-२१ ), पुढें भाऊरावांनीं प्रपंच चालवून परमार्थ कसा साधला ( २१-३१ ), लोकनिंदेस कसें जुमानलें नाहीं ( ३१-३९ ), कित्येक वर्षें गुरूवर विश्वास ठेवून खडतर तप कसें केलें ( ४०-४५ ), निंबरगीमहाराजांचा देहांत झाल्यावर प्रेमदुःखानें विव्हल होऊन दुप्पट जोरानें साधन कसें चालविलें, व अद्वैतसिद्धि कशी मिळविली ( ५०-५५ ), याचें वर्णन पंचसमासी समास २ यामध्यें सांपडेल पूर्ण अद्वैतबोध झाल्यावर केवळ लोकानुग्रह करणाच्या इच्छेनें गांवोगांवीं हिंडून त्यांनीं भक्ति कशी वाढविली, व समुदाय वाढवीत असतां त्यांचें वर्तन कस असतें याचें थोडें दिग्दर्शन त्याच समासांत ( ५५-७४ ), ओंव्यांत सांपडेल. त्यांचें वय हल्लीं ६८

वर्षांचें आहे व त्यांस दोन मुलगे आहेत. त्यांनीं जिल्हा विजापूर येथें एक मठ स्थापिला आहे; व तेथें वर्षांतून तीन वेळेस उत्सव होत असतो. चैत्र शु० ९ ते १५ पर्यंत सप्ताह होतो; नंतर सर्व श्रावणमासपर्यंत त्यांचे पुष्कळ शिष्य तेथें जमून साधन वाढवितात; पुनः मार्गशीर्ष शु० ९ ते १५ पर्यंत दुसरा सप्ताह होतो. त्या मठाचें व सप्ताहाचें वर्णन पंचसमासी समास ३ मध्यें आहे. महाराजांच्या मुख्य मुख्य शिष्यांचें वर्णन समास ४ मध्यें आहे. पांचव्या समासांत ग्रंथ-कर्त्यानें विविध विषयांचें विवरण केलें आहे.

कोणत्याही मोठ्या पुरुषाची योग्यता त्याजवळ पुष्कळ दिवस सतत राहिल्यावांचून कळत नाहीं. त्याच-प्रमाणें श्रीभाऊरावमहाराज यांची योग्यता थोडी-बहुत तरी कळण्यास त्यांजवळ पुष्कळ दिवस राहून त्यांच्या प्रत्येक क्रियेचें अवलोकन केलें पाहिजे. त्यांची पूर्ण योग्यता कळण्यास प्रत्यक्ष त्यांप्रमाणेंच झालें पाहिजेः— " तुका ह्मणे अंगें व्हावें ते आपण । तरीच

महिमान येईल कळो ॥ " हें शक्य नसल्यानें त्यांची थोडीचहुत तरी योग्यता त्यांच्याशीं सहवास केल्यानेंच कळणार आहे. प्रस्तुत लेखकास अलीकडे वरेच दिवस त्यांजबरोबर राहण्याचा प्रसंग आला होता; व त्यांच्या प्रत्येक क्रियेचें त्यानें सूक्ष्म अवलोकन केलें आहे. त्यांची निःस्पृहता, त्यांचें दयाळुत्व, त्यांचा नेमस्तपणा, त्यांचा दृढतर मनोनिग्रह, आबालवृद्धांशीं समता, शिष्यांवर अलोट प्रेम, गुरूंवर व आत्मज्ञानावर निःसीम भक्ति, अलौकिक शांति व उपाधींपासून अलिप्त राहण्याची शैली, हे व इतर अनेक गुण वरवर पाहणारास सुद्धां दिसून येतील. फार काय सांगावें ! दासबोधांतर्गत निःस्पृह वर्तणूक ( ११–१० ), निःस्पृहलक्षण ( १४–१ ), निःस्पृहव्यापलक्षण ( १५–२ ) वगैरे जे आचारबोधक समास आहेत त्यांतील प्रत्येक ओंवीप्रमाणें त्यांनीं आपलें वर्तन ठेविलें आहे !

साधु कोणास म्हणावें याबद्दल बहुजनसमाजाच्या फारच चमत्कारिक कल्पना असतात. प्रत्ययाचें ब्रह्म-

ज्ञान कोणीच पहात नाहींत. जो नानाविध चमत्कार करतो अथवा अप्रबद्ध बोलत असतो तोच साधु; ज्याचें शरीर वृद्धापकाळींही तेजःपुंज असतें, अथवा ज्याचा शिष्यसमुदाय फार तोच साधु; ज्याच्या शिष्य-वर्गांत पुष्कळ विद्वान् व श्रीमंत लोक असतात, अथवा उपनिषदें, भाष्य वगैरेंचें ज्यास उत्कृष्ट विवरण करतां येतें त्यासच साधु ह्मणावें. अशा अनेक प्रकारच्या कल्पनांनीं जनसमुदायांत काहूर उठविलें आहे. आत्म-ज्ञानाचा लोप झाला असल्यानें जिकडे तिकडे अज्ञा-नांधकार पसरला आहे. या अज्ञानांधकाराचा नाश करण्याचें दिव्यकार्य भाऊरावमहाराज करीत आहेत. ते स्वतः चमत्कार करीत नाहींत; पण अनेक चमत्कार आपोआप होतात:—

आपण महती न करिती । परी सर्वत्र
चमत्कार होती । कां ते पुण्यमार्गें चाल-
ती । म्हणोनियां ॥

ज्ञानास सिद्धींचा विटाळ। ऐसें वदती वेळोवेळ। परी तो गोविंद कृपाळ। भक्तकाज करीतसे ॥

पं. स. २–७१,७२.

" शब्दज्ञानानें भुलून जाऊं नका " असें ते नेहमीं सांगत असतात. " बाबांनो, मी धनगर आहें. मला व्याकरण, कोश वगैरे कांहीं येत नाहीं; माझा स्वामी मात्र कृपेसहित हृदयीं वसत आहे " असें ते नेहमीं ह्मणतात.

कित्येक लोकांचा असा आक्षेप आहे कीं, महाराजांस संस्कृत येत नाहीं; भाष्यें, उपनिषदें वगैरे न वाचतां हे साधु कसे असूं शकतील ? या अज्ञ लोकांस विद्वत्ता व आत्मज्ञान यांमधील फरक मुळींच कळत नाहीं. वेद कंठरवानें असें सांगत आहेः—

" द्वे विद्ये इह वेदितव्ये यत्परा चापरा चेति । अपरा यदृग्वेदो यजुर्वेदोऽथर्ववेदः सामवेदः । परा यया तदक्षरमधिगम्यते ॥"

विद्वत्ता व आत्मज्ञान, परा व अपरा विद्या, शब्द-ज्ञान व निःशब्दज्ञान यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. वेदशास्त्रांचें पठण केलें म्हणजे आत्मज्ञान होतेंच असें नाहीं; वेदशास्त्राध्ययनावांचूनही आत्मज्ञान होणें शक्य आहे.

" स्थाणुरयं भारहरो वेदानधीत्य न वि-
जानाति योऽर्थम् " ॥ " अनुभूतिं विना
मूढो वृथा ब्रह्मणि मोदते । प्रतिबिंबित-
शाखाग्रफलास्वादनमोदवत् ॥ "

इत्यादि वेदांतील वाक्येंही केवल विद्वत्ता व आत्म-ज्ञान यांतील फरक दाखवीत आहेत. प्रत्यक्ष अनुभव न मिळवितां केवळ वेदान्त वाचून आपण ब्रह्म झालों अशा कल्पनेनें कित्येक लोक फसून जातात ! या मुद्याचें विवेचन स्थलसंकोचास्तव येथें जास्त करतां येत नाहीं. असो.

श्रीकाडसिद्धांपासून निंबरगीमहाराजांनीं व निंबरगी महाराजांपासून भाऊरावमहाराजांनीं जें हें आत्मज्ञन

मिळविलें तें आहे तरी काय अशी येथें जिज्ञासू वाचकांस शंका येईल. ज्या ज्ञानानें पूर्वी थोर थोर ऋषी पैलपार पावले तें हें च ज्ञान होयः—

" व्यास वसिष्ठ महामुनी । शुक नारद समाधानी । जनकादिक महाज्ञानी । येणेंचि ज्ञानें ॥ २३ ॥ वामदेवादिक योगेश्वर । वाल्मीक अत्रि ऋषेश्वर । शौनकादि अध्यात्मसार । वेदांतमतें ॥ २४ ॥ सनकादिक मुख्य करूनि । आदिनाथ मीन गोरक्षमुनी । आणिक बोलतां वचनीं । अगाध असती ॥ २५ ॥ "

—दासबोध ५—६.

अथवा अलीकडील साधुसंतांत

" निवृत्ति ज्ञानेश्वर । नामा आणि कबीर । एकनाथ गोरा कुंभार । कलियुगामाजीं ज्ञान यांसी ॥ २४३ ॥ सोपान मुक्ताबाई । परमानंद जोगा पाही । भानु-

दास मिरावाई । रामदास सोई लागलासे ॥ २४४ ॥ वेणूवाई विसोवा खेचर । तुको-वा नरहरी सोनार । नरसी मेहता रोहि-दास चांभार । संत अपार अनुभवी ॥ २४५ ॥ चहूं युगांमाजी कोणी । जे जे झाले ब्रह्मज्ञानी । ते याचि अनुभवें क-रोनी । सत्य मानी वचनातें ॥ २४६ ॥ ”

—दीपरत्नाकर, अध्याय ४.

या उताऱ्यांवरून इतकें व्यक्त होईल कीं या, सर्व साधुसंतांनीं आत्मज्ञान हेंच आपलें ध्येय केलें होतें.

आतां आत्मज्ञान म्हणजे काय ? आत्मज्ञान म्हणजे आपण आपल्यास पहाणें.

“ ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान ह्मणिजे आत्मज्ञान । पाहावें आपणासि आपण । या नांव ज्ञान ॥ ”

—दासबोध, ५-६-१.

श्रीमद्भगवद्गीतेंतही राजयोगाचें फल आत्मदर्शन हेंच दिलें आहे:–

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ।
सुखमात्यंतिकं यत्तद् बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्वतः ॥

—अध्याय ६ गीता.

आत्मदर्शन झाल्यावर अतींद्रिय पण बुद्धिग्राह्य सुख होतें; व तें सुख अनुभवीत असतां आसनापासून हलूं नये असें वाटतें असा गीतावचनाचा सारांश आहे. उपनिषदांतही " परं ज्योतिरूपसंपद्य स्वेन रूपेण आभिनिष्पद्यते सोऽयमात्मा " असें वचन आहे. पतञ्जलींनीं योगाचें फल " तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् " असेंच दिलें आहे. श्रुतिस्मृतिपुराणांनीं जी ही आत्मज्ञानाची कल्पना करून दिली आहे ती सद्गुरूस शरण गेल्यानेंच अनुभवास येते. " सत्वाचें चांदणें, " " पहावा दर्पणींचा नयन, " " पोथी वाचूं जातां पाहे, मातृकांमध्येंचि

आहे, " " करें घेतां वस्तुलागीं, आडवें ब्रह्म " इत्यादि वाक्यांचा गुरुकृपेवांचून बोध होणें अशक्य आहे. सर्व साधुसंतांनीं आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां राजयोग व भक्ति यांची विलक्षण सांगड घातली होती. आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर देव व भक्त यांमधील विभक्तपणा निवून जातो; आपण ब्रह्म आहों अशी खात्री झाल्यावर सर्वां भूतीं भगवद्भक्त दिसूं लागतो हाच सर्व साधुसंतांचा उपदेश आहे. प्रथम आत्मदर्शन कसें होतें व नंतर अभेदबुद्धि कशी होते याचें श्रीज्ञानदेवांनीं उत्कृष्ट निरूपण केलें आहे:—

> नुसधें मुख जैसें । दर्पणीं देखिजतसें
> दर्शनामिसें । वायांचि देखणें ऐसें ।
> गमों लागे ॥ ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे ।
> दोन्हीही डोळस आरिसे । परस्परें पाहतां
> कैसें । मुकले भेदा ॥

—चांगदेवपासष्टी.

धन्य ते साधु कीं ज्यांनीं हा अनुभव घेतला आहे ! वरील दोन ओंव्यांत ज्ञानदेव महाराजांनीं सर्व वेद, सर्व शास्त्रें व सर्व पुराणें यांचें सार थोडक्यांत सांगितलें आहे. याचा अनुभव येण्यास साधनें ह्मटलीं ह्मणजे प्रथम गुरुकृपा पाहिजे, व नंतर श्रवण, विचार व अभ्यास हीं पाहिजेत; नंतर विवेकवैराग्य उत्पन्न होऊन मनुष्य आत्मदर्शनास पात्र होतो. आत्मदर्शन झाल्यावर हृदयग्रंथि तुटते, सर्व संशय नष्ट होतात, नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते, व देवांत आणि भक्तांत भेद उरत नाहीं. साधक द्वैतापासून अद्वैतास,आकारापासून निराकारास, स्वरूपापासून ब्रह्मस्थितीस सहज प्राप्त होतो !

श्रीभाऊरावमहाराजांची जी एवढी योग्यता आहे ती केवळ ते आत्मज्ञानपारंगत झाले आहेत म्हणून होय. सर्व उपनिषदांचें जें मुख्य सार तें त्यांनीं स्वानुभवास आणिलें आहे. त्यांनीं प्रत्यक्ष उपनिषदें वाचलीं नसतील, पण त्यांनीं उपनिषदांच्या बापास आपल्या कंठांत सांठविलें आहे. श्रीतुकाराममहाराजांनीं ह्मटलें आहे:—

" वेद आह्मांवरी रुसोनियां गेला । आह्मीं त्याच्या वाला धरिलें कंठीं ॥ " आत्मज्ञानास शब्दज्ञानाची मदत होते पण आवश्यकता नाहीं, हें तत्व जे सदैव उराशीं बाळगतील त्यांसच निःशब्दज्ञानाची प्रीति उत्पन्न होऊन बुद्धीहूनही पर जो परमात्मा त्यास प्राप्त हो-ण्याचा मार्ग सांपडेल. ईश्वराचें नाम घेतलें असतां रूप सहजींच प्रकट होणार आहे; अहर्निशीं नाम घोकिलें असतां देवास भक्तांपासून अन्यत्र जातांच येत नाहीं ! वनांतरास जाऊं नका; बैसले ठायीं तुम्हांस श्रमाचें फल प्राप्त होईल:-

" बैसोनि निवांत शुद्ध करी चित्त ।
तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥
येऊनि अंतरीं राहील गोपाळ ।
सायासाचें फळ बैसलिया ॥ २ ॥
राम कृष्ण हरी मुकुंद मुरारी ।
मंत्र हा उच्चारी वेळोवेळां ॥ ३ ॥

तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य ।
जरी होईल भाव एकविध ॥ ४ ॥ ”

हा महाराजांचा उपदेश हृत्पटलावर सदैव कोरून ठेवण्याजोगा आहे !

एकदां एका गृहस्थांनीं महाराजांस म्हटलें होतें:— ‘तुमचें भजन ऐकिलें म्हणजे तुमचा मार्ग काय आहे हें तावडतोब लक्षांत येतें. ’ याची सत्यता पुढील भजन वाचण्याची जे तसदी घेतील त्यांस कळून येणार आहे. तथापि त्यांतील मुख्य स्थलें दाखविलीं असतां पुष्कळ लोकांस फायदा होईल असें वाटल्यावरून त्या स्थलांचा थोडा निर्देश करून ही बरीच वाढलेली प्रस्तावना पुरी करितों. जसा जसा गुरूपदेशाचा अनुभव येईल तसा तसा गुरुपदीं जास्त अभिलाष उत्पन्न होतो (विषय नं० २). अलक्ष्यीं लक्ष्य लाविलें असतां निजवस्तु प्रत्ययास येते; घडि पळ घडीनें काळाचें मात्र सार्थक करावें; संतप्रमाण आत्मज्योत सहज प्रतीतीस येते (वि. नं० ३). अहंकारावर स्वार होऊन त्याला पाडावें

केल्यावर अनुहताच्या विजयदुंदुभि वाजतात व "सर्वत्र तद्वीक्षण " रूपी एकांत भक्ति उत्पन्न होते ( ४ ). गुरूंच्या उपकाराचें उतराई होणें केव्हांही शक्य नाहीं ( ६. ) त्रिवेणीचें नित्य स्नान करून आत्मारामाचें दर्शन घेतलें असतां " कर्मण्यकर्म " व " अकर्माणि कर्म " सहज होतें ( ७ ). देह हीच खरी पंढरी, व आत्मा हाच खरा विठ्ठल ( ९ ). निस्त्रैगुण्य प्राप्त करून घेण्यास प्रथम सत्त्वाचें सामर्थ्य उत्पन्न झालें पाहिजे. " सत्वेनान्यतमौ हन्यात् सत्वं सत्वेन चैव हि" ( १० ). आपण कोणीही तरेल; पण जो दुसऱ्यांस उद्धरील तोच खरा साधु ( ११ ). गंगेप्रमाणें आपलें मन स्वच्छ झालें असतां भगवंत जवळच उभा आहे. अशा पुरुषांस श्रुतिसंमत अंगुष्ठप्रमाण रूप दिसतें; अनुभवी मनुष्यासच ही खूण कळणार, " येरा टकमक " पाहूं लागतो ( १३ ). आत्मस्वरूप हें ज्ञानदृष्टीचें देखणें आहे; चर्मदृष्टि पाहूं शकत नाहीं. सत्संगानें प्रारब्धरेषा उगवते, व हरीच्या गुणनामांचा घोष

केला असतां पापें जळून जातात. ( १४ ). देहभाव विराल्याखेरीज वस्तु प्राप्त होत नाहीं ( १५ ). साधकांनीं कल्पनेचें आडरान न घेतां आपण आपल्यांस पाहून आनंदांत निमग्न व्हावें ( १६ ). सर्व प्राणिमात्रांवर दया करणें हेंच आत्मज्ञानाचें प्रथम साधन आहे ( १७ ). स्वरूपानुसंधानानें सहज समाधि प्राप्त होते (१८). अंतःकरणांत समुद्राप्रमाणें शांति उत्पन्न होऊन जडमूढ पिशाचवत् पृथ्वीवर साधु हिंडतात. ते लोकांस मूर्खाप्रमाणें भासतात,पण स्वतः ब्रह्मानंदांत मग्न असतात. त्यांचें वर्म योग्यांखेरीज दुसऱ्यांस कळत नाहीं ( १९). लवण जसें समुद्रास मिळून तदाकार होतें, तसेंच साधु ब्रह्मास मिळतात व त्यांचें नामरूपही लयास जातें. (२०). साधन करितां करितां सद्भक्ति उत्पन्न होईल,व सद्भक्तीनें साक्षात्कार होईल ( २१ ). पदोपदीं श्रीमुख पाहिल्यावर नंतर प्रत्यक्ष पाउलें दिसतील ( २२ ). श्रीविठ्ठल म्हणतात कीं, “ हे तुकारामा, तुझ्या अभंगाचें जे प्रेमानें पठण करितात त्यांच्या विपत्ति मी

स्वतः हरण करितों. " ( २५ ). ज्या गुरूपाशीं सर्वदा देव आहे त्यांचे चरणीं भाव ठेविला असतां आपल्यास देवाची प्राप्ति सहज होते ( २६ ).बाह्यसव्य, खालींवर, सबाह्य अभ्यंतरीं सर्वत्र देवाचें दर्शन होतें ( ३९ ). देवाचें दर्शन झाल्यावर आनंदानें त्रिभुवन कोंदाटून जातें ( ४१ ). देहामध्येंच देव पाहून निर्गुणाच्या ज्योतींनीं त्यास ओंवाळावें ( ४८ ). चंद्रसूर्य हेच तेथें दिव्याचें काम करितात ( ४९ ). पांडुरंगाच्या आरतीच्या वेळेस महाद्वारीं सिंहशंखनाद व भेरीगजर होत असतो ( कांकड आरती ६ ). अंतरीं आरती चालली असतां त्या प्रकाशांत रविशशि सुद्धां लोपून जातात, व अनुहत वाद्यांचा गजर होतो; व आनंदसागरांत बुडी दिल्यानंतर ज़ी स्थिति प्राप्त होते ती वाचेनें बोलून दाखवितां येत नाहीं, किंवा मनानेंही आकलन करतां येत नाहीं. ( कांकड आरती ७ ).

पुढें भजनांत ज़े तुकारामाचे बारा अभंग दिले आहेत ( १०–२१ ), ते व त्यापुढील २ अभंग हे

निंवरगीमहाराजांच्या वेळेपासून या सांप्रदायांत नित्य म्हणण्याची वहिवाट पडली आहे. हेच कोटें कोटें " चवदा अभंग " या नांवानें प्रसिद्ध आहेत.

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं म्हटलें आहे:- तुकाराम, नामदेव, ज्ञानदेव इत्यादिकांचे अभंगही किती आहेत याचा ठिकाण नाहीं !

" चार कोटी एक लक्षाच्या शेवटीं । चवतीस सहस्र सांगितले ॥ सांगुनि इतु-कें तुका कथिता झाला । ' चवदा अभं-गा ' सोडूं नका ॥ "

याचाच निराळा पाठ आमच्या भजनांत अभंग २३ यांत पहावा. हे बारा अभंग श्रीतुकाराममहाराजां-नीं विदेहमुक्ति मिळविल्यावर त्यांची टाळ आणि गोधडी जी खालीं पडली त्याबरोबर शेवटचा निरोप म्हणून पाठविले आहेत:-

" टाळ आणि कंथा धाडिली निशाणी। घ्यारे ओळखोनी सज्जन हो ॥ माझें दंडवत तुम्हां सर्व लोकां। देहासहित तुका वैकुंठासी ॥ "

—भजन अभंग २१.

हे अभंग तुकारामहाराजांचेच आहेत अशी लोकांची खात्री व्हावी ह्मणून " टाळ आणि कंथा " निशाणीरूपानें त्यांजवरोबर पाठविण्यांत आल्या. परंतु ही निशाणी पाठविण्यांत आली तथापि ते तुकारामहाराजांचेच आहेत किंवा कसें याबद्दल मोठ्या लोकांत सुद्धां मतभेद आहे. अलीकडे निर्णयसागर प्रेस, इंदिरा प्रेस किंवा इंदुप्रकाश प्रेस यांनीं छापलेल्या गाथेंत हे अभंग दिलेच नाहींत. ह. भ. प. विष्णुबुवा जोग यांच्या सार्थ गाथेंत क्षेपकांतही हे अभंग दिले नाहींत. हे अभंग स्वतंत्ररूपानें मात्र उपलब्ध आहेत;

व पुष्कळ साधुसंतांच्या तोंडीं असल्यानें पुष्कळ प्रसिद्धि पावले आहेत. शिवाय तुकारामतात्या यांनीं आठ दहा हजार अभंगांची जी तुकारामाची गाथा दोन भागांत छापली आहे तींतही हे सांपडतात. याखेरीज, हे अभंग तुकारामाचेच आहेत असें ह्मणण्याबद्दल आणखी एक पुरावा आहे. त्या अभंगांतील विलक्षण प्रेमळपणा व ओतंप्रोत भरलेला स्वानुभव, यांचा विचार केला असतां हे अभंग तुकारामहाराजांच्या वाणींतूनच बाहेर पडले असावे असें सबळ अनुमान होतें.

बरें ! तुकाराममहाराजांच्या अभंगसंख्येबद्दल तरी लोकांत एकमत कोठें आहे ? हल्लींच्या ज्या नांवाजलेल्या गाथा आहेत त्यांत ४।५००० च अभंगांची संख्या आहे. तुकारामतात्यांच्या गाथेंत ८।१०००० दिली आहे. वर घेतलेल्या शास्त्रीबोवांच्या एक लक्ष

उताऱ्यांवरून व शिवाय आमच्या अभंग २३ वरून ' चार कोटी एक लक्ष चौतीस हजार ' अभंग-संख्या आहे असें दिसतें. महिपतीच्या म्हणण्याप्रमाणें ४ कोटी आणि कांहीं लक्ष संख्या आहे (संतलीलामृत). तुकाराममहाराजांची अभंगसंख्या ठरविण्याच्या दृष्टीनें आमच्या भजनांतील अभंग २४ अतिशय महत्वाचा आहे; तो जिज्ञासूंनीं अवश्य वाचावा. त्यांत पांच कोटी एक लक्ष चौतीस सहस्र अभंग-संख्या असल्याबद्दल उल्लेख आहे. रा. शंकर पांडुरंग पंडित यांनीं हा अभंग आपल्या इंदुप्रकाश-गाथेंत प्रस्तावनेंत दिला आहे. फक्त " तीस लक्ष केली देवासि करुणा । कर्मकांड जाणा एक लक्ष " ही ओळ गाळली आहे. ही ओळ गाळूनही त्यांची बेरीज वरील संख्येवर गेली आहे ! आतां आमच्या अभंगा-प्रमाणें बेरीज करितां पांच कोटी एक लक्ष चौतीस सहस्र बरोबर बेरीज येत आहे:—

| | |
|---|---|
| १२००० | संहिता |
| १०००० | उपग्रंथ ( अवतारसहस्र ) दशसहस्र |
| १०००००० | भक्ति |
| १०००००० | ज्ञान |
| ७५००००० | वैराग्य |
| ७५००००० | नाम |
| ६०००००० | बोध |
| ६०००००० | रूप |
| ३०००००० | करुणा |
| १००००० | कर्मकांड |
| १२००० | स्वानुभव |
| ५०१३४००० | पांच कोटि एक लक्ष चौतीस हजार. |

हा अभंग तुकारामाच्या अभंगसंख्येच्या चर्चेंत अत्यंत महत्वाचा आहे म्हणून इतक्या विस्तारानें लिहिणें भाग पडलें !

प्रस्तावना बहुतेक संपली. प्रथम लहान प्रस्तावना लिहिण्याचा उद्देश होता, परंतु लिहिण्यास सुरुवात केल्या-वर प्रत्येक महत्वाचा प्रश्न डोळ्यांपुढें उभा राहिल्यानें त्याचें थोडेंना थोडें तरी विवरण केल्याखेरीज पुढें जाववेना. महाराजांचें समग्र चरित्र लिहिणें कोणाच्या नशिबीं असेल तें असो. त्यास ही प्रस्तावना थोडीबहुत तरी उपयोगी पडावी व शिवाय सांप्रदायाबाहेरील लोकांस या सांप्र-दायाची मुख्य शिकवण कोणती हें कळावें या उद्देशानें ही प्रस्तावना लिहिली आहे. पुढें छापलेल्या भजनांत कांहीं पाठ अशुद्ध असण्याचा संभव आहे. परंतु पुष्कळ मेहनतीनें सांप्रदायांतील पाठ इतर पाठांशीं ता-डून योग्य ते पाठ घेण्याची व्यवस्था केली आहे. जेथें दोन्ही पाठ सारखेच वाटले तेथें सांप्रदायांतीलच ठेविला आहे. भजनाचें हस्तलिखित पुस्तक व पंचसमासी नामक प्रकरण हीं आमचे मित्र रा. पंचनदीकर यांजकडे

शद्धीकरितां प्रथम पाठविलीं होतीं; त्या प्रसंगीं त्यांनीं केलेलें पद शेवटीं दिलें आहे. तदनंतर तीं पुन्हां आमच्या दुसऱ्या एका गुरुबंधूकडे पाठविण्यांत आलीं. त्यांनीं होतां होईल तों शुद्ध करून तीं आह्मांकडे परत पाठविलीं. प्रस्तावना, पंचसमासी समास २ पकीं पुष्कळ भाग, व पांचव्या समासांतील मुक्तिलक्षण (६७–८१) हीं त्यांच्याच हातचीं आहेत. शेवटीं ज्या परमेश्वरानें ह ुस्तक छापण्याचा सुयोग घडवून आणिला त्याचे चरणींच अर्पण करून ही प्रस्तावना पुरी करतों.

प्रकाशक.

---

# भजनारंभ.



गुरुवारः–जय जय गुरुमहाराज गुरू ( ४ वेळ )
जयगुरु जयगुरु जयगुरु जयगु०(२वेळ)
जयजय गुरुमहाराज गुरू ।
जयजय परब्रह्म सद्गुरु ॥ ( १ वेळ )

शुक्रवारः–पावना रामा पतीतपावना रामा
( खालील स्वरांत २ वेळ )
पावना रामा ( इतकेंच उंच स्वरावरून चालू स्वरांत आल्यावर पूर्ववत् खालील स्वरांत)पावना रामा पतीतपावना रामा (२ वेळ) हरि नारायण गुरुनारायण ।
घडिघडि जिव्हे करि पारायण ।
तव दासोऽहं नारायण ।
हरि नारायण गुरुनारायण ॥

लक्ष्मी श्रीरंगधर सीतारघुवीर राधेगोविंदा ।

हरि हरि राधेगोविंदा ।
रखुमाई पांडुरंगा ( ३ वेळ )

शनिवार:—शुक्रवारप्रमाणेंच.

रविवार:—सांव सदाशिव सांव सदाशिव सांव
सदाशिव सांव हरा हरा ( सावकाश )

सोमवार:—सांव सदाशिव सांव सदाशिव
सांव सदाशिव सांवा ( जल्द २ वेळ )
सांव सदाशिव सांऽव(उंच स्वरांत १ वळ)
सांव सदाशिव सांव सदाशिव
सांव सदाशिव सांवा ( पूर्ववत् २ वेळ)

मंगळवार:—रविवारप्रमाणेंच.

बुधवार:—हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा
( खालील स्वरांत ३ वेळ )
हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा
( उंच स्वरांत ३ वेळ )
हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा
( चालू स्वरांत ३ वेळ )

# प्रदक्षिणा.



धन्यहो प्रदक्षिणा सद्गुरुरायाची ।
धन्य धन्य हो प्रदक्षिणा श्रीगुरुरायाची ।
झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची ॥ ध्रु० ॥
पदोपदीं घडल्या अपार पुण्याच्या राशी ।
सकळही तीर्थें घडलीं आम्हां आदिकरुनि काशी ॥
कोटि ब्रह्महत्या हरती करितां दंडवत ।
लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत ॥ २ ॥
मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थें गाती ।
नामसंकीर्तनीं नित्यानंदें नाचती ॥ ३ ॥
गुरुभजनाचा महिमा न कळे निगमां आगमांसी ।
अनुभव जे जाणती ते गुरुपदिंचे अभिलाषी ॥४॥
प्रदक्षिणा करुनी देह भावें वाहिला ।
श्रीरंगात्मजा विठ्ठल पुढें उभा राहिला ॥ ५ ॥

अलक्ष्य लक्षुनि पाहे निजवस्तु । परात्पर चिन्मय ब्रह्मरूप तेज प्रत्यक्ष आहे ॥ गुरुपद वंदुनि आधिं पाहि तूं । हृदयांतरिं शोधुनी मनातें धूर्त करी शोधुनी ॥ कामक्रोध मदमत्सर अंगीं । दंभाहंकार जिरवुनी द्वैत-कल्पना-सार त्यागुनी ॥ एकाग्रें मन स्वस्थ करोनी । बैस पद्मासनीं मुद्रा लाव आत्मभापणीं ॥ दृष्टी आंत दृष्टि सुरंग । करूनियां समदृष्टि मग । नाना तऱ्हेचे रंग सुरंग । रक्तश्वेतवत आहे पुढें नीलवर्ण तेज जाणावें ॥१॥ नीलवर्ण तें चिदाकाशीं । चैतन्याची मुस त्यामध्यें वस्तु जडली असे ॥ त्रिकुट भेदुनी उलट जातां । मी मार्गानें धसे रूप अरूप होउनी प्रवेश ॥ उन्मन होउनियां ब्रह्मरंध्रीं । समाधि लावुनि बसे तेथें काळ कदा ना धसे ॥ सिद्ध पुरुष तो योग साधुनी । तापा स्तवितो करून हरण । आपुला आपण राहे निमग्न । त्यालाचि प्राप्ति होय चराचर अवघेंचि ब्रह्म आहे ॥ २ ॥

सद्गुरुकृपा जखमाचि वारी । ज्याला घाव लागेल तोचि घायाळगती घुमतो ॥ बीजमंत्र हा जप गायत्री । अष्टौप्रहर योजितो साधन घडि पळ घडि साधितो ॥ अहंभावें अीपण तन धन । गुरुचरणीं अर्पितो तो हा मूळ पित्या इच्छितो ॥ अखंड तन्मय त्यांत लुब्धुनी । निजवस्तु लक्षितो लोचनीं । निरापेक्ष तो निर्मळ प्राणी । जगांत वडा राहे अंतरीं ज्ञानबोधरस पिये ॥ ३ ॥ सद्गुरुकृपा उत्तम ज्यासी । सहज हातासी आली त्याला निजवस्तु लाधली ॥ पाहतां पाहतां आत्मज्योत ही । वैराग्यें पाजळली चिन्मय वस्तु डळमळली ॥ शाहालिंग संतप्रमाण । धन्य गुरुमाउली आनंदें हरिवर कृपा केली ॥ कवनकटाक्षें करि सिद्धांत । गणपति भीमसेन गातो सभेंत । गुरुपुत्र तो ज्ञानवंत । ऐकुनि तल्लिन होये लुंगरा व्यर्थ चावटी वाहे ॥ ४ ॥

काय सांगूं या समर्थाची थोरी ।
भजकासी आपणाऐसा करी ॥ ध्रु० ॥
सद्गुरुराजा तन्मय छत्रपती ।
मज करुनी सेवे अधिपती ।
सोऽहं शब्द सनद देउनि हातीं ।
शिरीं हात ठेविला मुद्रांकित ॥ १ ॥
अहंकाराचे दुर्ग आवरीले ।
तयावरी मजला पाठवीलें ।
पूर्वद्वारें त्रिकूट देखीयेलें ।
रजोदृष्टी ब्रह्मयासी जिंकीयेलें ॥ २ ॥
तेथुनि ऊर्ध्वपंथें पश्चिममार्ग पाहे ।
सत्वगुणीं श्रीहाटीं विष्णु आहे ।
तया वळंघोनी वरुता जाय ।
तमो गोल्हाटीं रुद्र दिसताहे ॥ ३ ॥
ज्ञानशस्त्र घेऊनियां हातीं ।
केली तमो-अज्ञानाची शांती ।
पुण्यगिरी तेथुनि देखे पुढतीं ।

शुद्ध अधिष्ठानीं विश्वमूर्ती ॥ ४ ॥
उभा राहोनी तया गिरिवरी ।
देखे भ्रमरगुंफा गह्वद ओवरी ।
औटपीठावरुती शोभे वरी ।
परमानंद आहे तया घरीं ॥ ५ ॥
बोधबळिया प्रवेशलों तेथ ।
अहंकार झाला वाताहत ।
विजयदुंदुभि वाजति अनुहत ।
ब्रह्मदृष्टींत पावलों निजविश्रांत ॥ ६ ॥
भक्तिनिशाण चढविलें वरी ।
जें कां ब्रह्म भासत चराचरीं ।
रामनामें गर्जती जयजयकारीं ।
दासपण न उरे तेथें उरी ॥ ७ ॥
* सखया रामा विश्रांति तुझे नामीं ।
म्हणउनि मजला ने त्वरें निजसुखधामीं॥ध्रु०॥
अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी ।
पशु-सुत-जाया-धन-धामीं प्रीती मोठी ।

माझीं माझीं म्हणुनि म्यां धरिलीं पोटीं ।
यांच्या संगें भोगिल्या दुःख-कोटी ॥ १ ॥
सोडुनि स्वहिता धांवलों दिशा दाही ।
शववत झालों मागुता कौतुक पाही ।
परि खळजन निंदिती कवडीतें ही ।
परिहे आशापापिणी लाजत नाहीं ॥ २ ॥
जंववरी दृढता तंववरी या तनुची प्रीती ।
जर्जर झालिया अवघेचि निंदक होती ।
याचीं दुःखें तुजला मी सांगूं किती ।
ह्मणउनि येतो श्रीधर काकुलती ॥ ३ ॥
* काय सांगूं मी या संतांचे उपकार ।
मज निरंतर जागवीती ॥ १ ॥
सहज बोलणें हित उपदेश ।
करूनि सायास शिकवीती ॥ २ ॥
काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई ।
ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ ३ ॥

तुका म्हणे वत्स धेनुवेच्या चित्तीं ।
तैसें मज येथें सांभाळी ती ॥ ४ ॥

* झाली संध्या संदेह माझा गेला ।
आत्माराम हृदयीं सहजीं आला ॥ ध्रु० ॥
गुरुकृपा निर्मळ भागीरथी ।
शांति क्षमा यमुना सरस्वती ।
अशीं पदें एकत्र जेथें होतीं ।
स्वानुभवस्नान हें मुक्तस्थिती ॥ १ ॥
सद्बुद्धीचें घालोनि दर्भासन ।
क्षमा दया श्रीगुरु पद्मासन ।
शम दम अंगीं विभूतिलेपन ।
वाचे उच्चारी केशवनारायण ॥ २ ॥
बोधपुत्र निर्माण झाला जेव्हां ।
ममता म्हातारी मरोनि गेली तेव्हां ।
भक्तिबहीण आली असे गांवा ।
आतां संध्या करूं मी कैशी केव्हां ॥ ३ ॥
सहज कर्म झालीं ब्रह्मार्पण ।

ऐसें ऐकोनी निवती साधुजन ।
जन नोहे अवघाचि जनार्दन ।
एकाजनार्दनीं लाधली निजखूण ॥ ४ ॥

* निरंजनीं वनीं देखिली मीं गाय ।
तीन तीचे पाय चार मुख ॥ १ ॥
सहस्र तीचे नयन नव तीचे कान ।
सत्रावीचें स्थान एक शिंग ॥ २ ॥
ऐशी कामधेनू व्यासानें पाळिली ।
शुकानें वळिली जनका-घरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें भाग्य नरा भेटे ।
अभाग्य करंटे वायां गेले ॥ ४ ॥

देह तो पंढरी प्रेम पुंडलीक ।
स्वभाव सन्मुख चंद्रभागा ॥ १ ॥
विवेकाची वीट आत्मा पंढरीराव ।
जेथें तेथें देव ठसावला ॥ २ ॥
क्षमा दया दोन्ही रुक्मिणी ते राई ।
दोहींकडे बाही उभी असे ॥ ३ ॥

बुद्धि व वैराग्य गरुड हनुमंत ।
कर जोडुनि तेथ पुढें उभा ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हीं देखिली पंढरी ।
चुकविली फेरी चौऱ्याशींची ॥ ५ ॥

---

## बारा अभंग.

जन्माचें तें मूळ पाहीलें शोधून ।
दुःखासी कारण जन्म घ्यावा ॥ १ ॥
पापपुण्य करुनी जन्मा येतो प्राणी ।
नरदेहा येऊनि हानि केली ॥ २ ॥
रजतमसत्व आहे ज्याचे अंगीं ।
याच गुणें जगीं वायां गेला ॥ ३ ॥
तम म्हणजे काय नरकचि केवळ ।
रज तो सबळ मायाजाळ ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें सत्वाचें सामर्थ्य ।

करावा परमार्थ अहर्निशीं ॥ ५ ॥

*अहर्निशीं सदा परमार्थ करावा ।
पाय न ठेवावा आडमार्गी ॥ १ ॥
आडमार्गी कोणी जन जे जातील ।
त्यांतुनी काढील तोचि ज्ञानी ॥ २ ॥
तोचि ज्ञानी खरा तारी दुजीयांसी ।
वेळोवेळां त्यासी शरण जावें ॥ ३ ॥
आपण तरेल नव्हे तें नवल ।
कुळें उद्धरील सर्वांचीं तो ॥ ४ ॥
शरण गेलियानें काय होतें फळ ।
तुका म्हणे कुळ उद्धरीलें ॥ ५ ॥

*उद्धरीलें कुळ आपण तरला ।
तोचि एक झाला त्रैलोक्यांत ॥ १ ॥
त्रैलोक्यांत झालें द्वैतचि निमालें ।
ऐसें साधियेलें साधन बरवें ॥ २ ॥
बरवें साधन सुख शांती मना ।
क्रोध नाहीं जाणा तिळभरी ॥ ३ ॥

तिळभरी नाहीं चित्तासी तो मळ ।
तुका म्हणे जंळ गंगेचें तें ॥ ४ ॥
* जैसी गंगा वाहे तैसें त्याचें मन ।
भगवंत जाण त्याचेंजवळी ॥ १ ॥
त्याचेजवळी देव भक्तिभावें उभा ।
स्वानंदाचा गाभा तया दिसे ॥ २ ॥
तया दिसे रूप अंगुष्ठ प्रमाण ।
अनुभवी खूण जाणती हे ॥ ३ ॥
जाणती हे खूण स्वात्मानुभवी ।
तुका म्हणे पदवी ज्याची त्याला ॥ ४ ॥
ज्याची त्याला पदवी इतरां न साजे ।
संताला उमजे आत्मसुख ॥ १ ॥
आत्मसुख घ्यारे उघडा ज्ञानदृष्टी ।
यावीण चावटी करूं नका ॥ २ ॥
करूं नका कांहीं संतसंग धरा ।
पूर्वीचा जो दोरा उगवला ॥ ३ ॥
उगवेल प्रारब्ध संतसंगें करुनी ।

प्रत्यक्ष पुराणीं वर्णियेलें ॥ ४ ॥
वर्णियेल्या एका गुणनामघोषें ।
जातील रे दोष तुका म्हणे ॥ ५ ॥
* दोष रे जातील अनंत जन्मींचे ।
पाय त्या देवाचे न सोडावे ॥ १ ॥
न सोडावे पाय निश्चय तो करा ।
आळवा शार्ङ्गधरा भावबळें ॥ २ ॥
धरुनी केशव आणा भावबळें ।
पापियां न कळे कांहीं केल्या ॥ ३ ॥
न कळे तो देव संतसंगावांचुनि ।
वासना जाळोनि शुद्ध करा ॥ ४ ॥
शुद्ध करा मन देहातीत व्हावें ।
वस्तुसी ओळखावें तुका म्हणे ॥ ५ ॥
* ओळखा रे वस्तु सांडा रे कल्पना ।
नका आडराना जाऊं झणीं ॥ १ ॥
झणीं जाल कोठें बुडवाल हीत ।
विचारी मनांत आपुलिया ॥ २ ॥

आपुलिया जीवें शिवासि पहावें ।
आत्मसुख घ्यावें वेळोवेळां ॥ ३ ॥
घ्यावें आत्मसुख स्वरूपीं मिळावें ।
भूतीं लीन व्हावें तुका म्हणे ॥ ४ ॥
भूतीं लीन व्हावें सांगावें नलगेचि ।
आतां अहंकाराची शांति करा ॥ १ ॥
शांति करा तुम्ही ममता नसावी ।
अंतरीं वसावी भूतदया ॥ २ ॥
भूतदया ठेवा मग काय उणें ।
प्रथम साधन हेंचि असे ॥ ३ ॥
असो हें साधन ज्याचे चित्तीं वसे ।
मायाजाळ नासे तुका म्हणे ॥ ४ ॥
मायाजाळ नासे या नामेंकरुनी ।
प्रीति चक्रपाणीं असों द्यावी ॥ १ ॥
असों द्यावी प्रीती साधूंचे पायांसी ।
कदा कीर्तनासी सोडूं नये ॥ २ ॥
सोडूं नये पुराणश्रवण कीर्तन ।

मनन निजध्यास साक्षात्कार ॥ ३ ॥
साक्षात्कार झालिया सहज समाधि ।
तुका म्हणे उपाधि गेली त्याची ॥ ४ ॥
गेली त्याची जाणा ब्रह्म तोचि झाला ।
अंतरीं निवाला पूर्णपणें ॥ १ ॥
पूर्णपणें धाला राहतो कैशा रीती ।
त्याची आतां स्थिती सांगतों मी ॥ २ ॥
सांगतों मी तुह्मां ऐका मनोगत ।
राहतो मूर्खवत जगामाजी ॥ ३ ॥
जगांत पिशाच अंतरीं शहाणा ।
सदा ब्रह्मीं जाणा निमग्न तो ॥ ४ ॥
निमग्न तो सदा जैसा मकरंद ।
अंतर्बाह्य भेद वेगळाले ॥ ५ ॥
वेगळाले भेद किती त्या असती ।
हद्दल त्याची गती न कळे कवणा ॥ ६ ॥
न कळे कवणाला त्याचें हेंचि वर्म ।
योगी जाणे वर्म खूण त्याची ॥ ७ ॥

ह्मण त्याची जाणे जे तैसे असती ।
तुका म्हणे भ्रांती दुजियाला ॥ ८ ॥

* दुजियाला भ्रांती भाविकांला शांती ।
साधूंची ती वृत्ति लीन झाली ॥ १ ॥
लीन झाली वृत्ति ब्रह्मातें मिळाले ।
जळांत आटलें लवण जैसें ॥ २ ॥
लवण जैसें पुन्हां जळाचे बाहेरी ।
येत नाहीं खरें त्यांतुनीया ॥ ३ ॥
त्यासारिखे तुह्मी जाणा साधुवृत्ति ।
पुन्हां न मिळती मायाजाळ ॥ ४ ॥
मायाजाळ त्यांना पुन्हां रे बाधेना ।
सत्य सत्य जाणा तुका म्हणे ॥ ५ ॥

* स्वर्गलोकींहूनि आले हे अभंग ।
धाडियेले सांग तुम्हांलागीं ॥ १ ॥
नित्यनेमें यांसी पढतां प्रतापें ।
जळतिल पापें जन्मांतरिंचीं ॥ २ ॥
तया मागेंपुढें रक्षी नारायण ।

मांडिल्या निर्वाण उडी घाली ॥ ३ ॥
बुद्धीचा पालट नासेल कुमती ।
होईल सद्भक्ति येणें पंथें ॥ ४ ॥
सद्भक्ति झालिया सहज साक्षात्कार ।
होईल उद्धार पूर्वजांचा ॥ ५ ॥
साधतील येणें इहपरलोक ।
सत्य सत्य भाक माझी तुम्हां ॥ ६ ॥
परोपकारासाठीं सांगितलें देवा ।
प्रासादिक मेवा ग्रहण करा ॥ ७ ॥
येणें भवव्यथा जाईल तुमची ।
सख्या विठ्ठलाची आण मज ॥ ८ ॥
टाळ आणि कंथा धाडिली निशाणी ।
घ्यारे ओळखोनी सज्जन हो ॥ ९ ॥
माझें दंडवत तुम्हां सर्व लोकां ।
देहासहित तुका वैकुंठासी ॥ १० ॥
* सत्य सत्य जाणा त्रिवाचा नेम हा ।
अनुभव पहा पदोपदीं ॥ १ ॥

पदोपदीं पहा श्रीमुख चांगलें ।
प्रत्यक्ष पाऊलें विठोबाचीं ॥ २ ॥
विठोबाचे भेटीं हरेल वा चिंता ।
तुम्हालागीं आतां सांगितलें ॥ ३ ॥
सांगितलें खरें विश्वाचिया हिता ।
अभंग वाचिती जे कां नर ॥ ४ ॥
ते नर पठणीं जीवन्मुक्त झाले ।
पुन्हां नाहीं आले संसारासी ॥ ५ ॥
संसार उडाला संदेह फिटला ।
पूर्ण तोचि झाला तुका म्हणे ॥ ६ ॥
चार कोटि एक लक्षाचा शेवट ।
चौतिस सहस्र स्पष्ट सांगितले ॥ १ ॥
सांगितले हे तुका कथोनियां गेला ।
बारा अभंगांला सोडूं नका ॥ २ ॥
सोडूं नका तुम्हां सांगितलें वर्म ।
भवपाशीं कर्म चुकतील ॥ ३ ॥
चुकती यातायाती विठोबाची आण ।

करा हें पठण जीवेंभावें ॥ ४ ॥
जीवेंभावें करितां होईल दर्शन ।
प्रत्यक्ष सगुण तुका म्हणे ॥ ५ ॥
* वेदाचे अभंग केले श्रुतिपर ।
द्वादश सहस्र संहितेचे ॥ १ ॥
निघंट निरुक्त आणि ब्रह्मसूत्र ।
अनंतर सहस्र उपग्रंथ ॥ २ ॥
अभंग एक कोटि भक्तिपर झाले ।
ज्ञानपर केले तितुकेची ॥ ३ ॥
पंचाहत्तर लक्षीं वैराग्य वर्णिलें ।
नाम तें गाईलें तितुकेंची ॥ ४ ॥
साठ लक्ष केला बोध या जगासी ।
वर्णिलें रूपासी तितुकेंची ॥ ५ ॥
तीस लक्ष केली देवासि करुणा ।
कर्मकांड जाणा एक लक्ष ॥ ६ ॥
द्वादशसहस्र स्वात्मानुभवीं ।
एवं जाणा सर्व संख्या ऐशी ॥ ७ ॥

ऐसे हे अभंग झालेसे भूतळीं ।
पांच अंतराळीं पत्रिकेची ॥ ८ ॥
चौतिस सहस्र लक्ष एक कोटि पांच ।
सांगोनियां साच गेला तुका ॥ ९ ॥
* सगुण हें ब्रह्म विठ्ठलाचि बोले ।
एक यां वहिले तुकारामा ॥ १ ॥
तुकारामा तुवां केले जे अभंग ।
करिती जे कां जगीं नित्य पाठ ॥ २ ॥
जगीं पाठ करितां आवडी सद्भावें ।
विपत्ति न होय त्या प्राण्यासी ॥ ३ ॥
प्राण्याचें कल्याण होईल वा पाहे ।
भावें वाचितां हे नित्यनेमें ॥ ४ ॥
नेमें संकष्टासी करी अकरा पाठ ।
विघ्न त्याचें स्पष्ट दूर होय ॥ ५ ॥
दूर होय विघ्न विठ्ठल म्हणे तुकया ।
शेवटीं निज ठाया नेईन मी ॥ ६ ॥
* गुरुचरणीं ठेविति भाव ।

आपेआप भेटे देव ॥ १ ॥
म्हणुनि गुरूसी भजावें ।
रूप ध्यानासी आणावें ॥ २ ॥
देव गुरूपाशीं आहे ।
वारंवार सांगूं काये ॥ ३ ॥
तुका म्हणे गुरुभजनीं ।
देव भेटे जनीं वनीं ॥ ४ ॥
जयजय गुरुमहाराज गुरु । ( ५ वेळ )
जयजय परब्रह्म सद्गुरु । ( १ वेळ )
जयगुरु जयगुरु जयगुरु जयगुरु ॥
जयगुरु जयगुरु जयगुरु जयगुरु
सब संतनकी जय !
बालगोपालकी जय !
तुकाराममहाराजकी जय !
ज्ञानोबामहाराजकी जय !
रुक्मांगदमहाराजकी जय !
कृष्णद्वैपायनमहाराजकी जय !

रामदासमहाराजकी जय !
रघुनाथप्रियमहाराजकी जय !
श्रीगुरुदेव दत्त दत्त दत्त !!!
रामाश्रम सद्गुरुराज ।
गुरुलिंगजंगममहाराज ॥ ( २ वेळ )
गुरुलिंगजंगममहाराज ( २ वेळ )
रामाश्रम सद्गुरुराज ।
गुरुलिंगजंगममहाराज ॥ ( २ वेळ )
आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा ।
माझिया सकळां हरिच्या दासा ॥ १ ॥
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं ।
ही संतमंडळी सुखी असो ॥ २ ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा ।
माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥
शरीर प्राणांसी करीन कुरवंडी ।
क्षण एक न सोडीं संग त्याचा ॥ ४ ॥
नामा म्हणे तया असावें कल्याण ।

ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ५ ॥
विठ्ठल रखुमाई विठोबा रखुमाई
विठ्ठल विठ्ठल विठ्ठल ! ! !

* मी तंव अन्यायी अपराधी ।
कर्महीन मतिमंदबुद्धी ॥ १ ॥
तुज म्यां आठविलें नाहीं कधीं ।
वाचे कृपानिधि मायबापा ॥ २ ॥
नाहीं ऐकिलें गाइलें गीत ।
धरिली लाज सांडिलें हित ॥ ३ ॥
नावडे पुराण बैसले संत ।
केली बहुत परनिंदा ॥ ४ ॥
केला नाहीं करविला नाहीं परोपकार ।
नाहीं दया आली पीडितां पर ॥ ५ ॥
करूं नये तो केला व्यापार ।
उतरी भार तुका म्हणे ॥ ६ ॥
ज्ञानोबा तुकाराम ज्ञानबा तुकाराम
तुकाराम तुकाराम तुकाराम ! ! !

* अहो बोलिलें लेंकरूं ।
वेडें वांकुडें उत्तरूं ॥ १ ॥
क्षमा करा अपराध ।
महाराज तुम्ही सिद्ध ॥ ध्रु० ॥
अहो नाहीं विचारिला ।
अधिकार म्यां आपुला ॥ २ ॥
तुका म्हणे ज्ञानेश्वरा ।
राखा पायांपें किंकरा ॥ ३ ॥

* गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा ।
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।
नमो शारदा मूळ चत्वारि वाचा ।
गमो पंथ आनंत या राघवाचा ॥ १ ॥

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ॥२॥
श्रूयतां देवदेवेश नारायण जगत्पते ।
त्वदीयनामध्यानेन कथयिष्ये शुभाः कथाः ३
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं

द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादि लक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥४॥

सद्गुरुनाथ माझे आई ।
मला ठाव द्यावा पायीं ॥ ( २ वेळ )
मला ठाव द्यावा पायीं ( २ वेळ )
सद्गुरुनाथ माझे आई ।
मला ठाव द्यावा पायीं ॥ ( २ वेळ )
कृपाळू सज्जन तुम्हीं संतजन ।
एवढें कृपादान द्यावें मज ॥ १ ॥
आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा ।
देवा माझी सांगा काकुलती ॥ २ ॥
अन्यायी अपराधी पतित आगळा ।
परि पायांवेगळा नका ठेवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी
मग मज हरी उपेक्षीना ॥ ४ ॥

* पाहिलें पाहतां श्रीमुख ।

तहान हरपली भूक ॥ १ ॥
पहा पहा डोळे भरी ।
मूर्ति सांवळी गोजिरी ॥ २ ॥
रवि शशी ज्याच्या कळा ।
तो हा मदनाचा पुतळा ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्णूं काय ।
घेतो आलया वालय ॥ ४ ॥
* सामरस्य दोहींकडे ।
दिसे देवाचें रूपडें ॥ १ ॥
खालीं पाहे अथवा वरी ।
जिकडे पहावें तिकडे हरी ॥ २ ॥
डोळे झांकुनियां पाहे ।
पुढें गोपाळ उभा आहे ॥ ३ ॥
अणुरेणु चक्रपाणी ।
म्हणून झाली दासी जनी ॥ ४ ॥
* हडवडलें पातक ।
रामनाम घेतां एक ॥ १ ॥

नाम घेतां तत्क्षणीं ।
चित्रें ठेविली लेखणी ॥ २ ॥
घेउनि पूजेचा संभार ।
ब्रह्म येतसे सामोर ॥ ३ ॥
नामा म्हणे हें जरी लटकें ।
तरी छेदावें मस्तक ॥ ४ ॥

* तिळाएवढें बांधुनि घर ।
आंत राहे विश्वंभर ॥ १ ॥
तिळाइतुकें विंदुलें ।
तेणें त्रिभुवन कोंदाटलें ॥ २ ॥
हरिहराच्या मूर्ती ।
विंदुल्यांत येती जाती ॥ ३ ॥
तुका म्हणे हें विंदुलें ।
तेणें त्रिभुवन कोंदाटलें ॥ ४ ॥

* आनंदू रे आजि आनंदू रे ।
सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदू रे ॥ १ ॥
एक दोन तीन चार पांच सहा ।

इतके विचारूनि मग परमानंदीं रहा २
सातवा राम आठवा वेळोवेळां ।
बापरखुमादेविवरु विठ्ठल जवळा ॥ ३ ॥

* पाहे प्रसादाची वाट ।
द्यावें धुवोनियां ताट ॥ १ ॥
शेष घेऊनि जाईन ।
तुमचें झालिया भोजन ॥ २ ॥
अहो झालों एकसवा ।
तुम्हां आड न ये देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त ।
करुनि राहिलों निवांत ॥ ४ ॥

---

# विडा.

विडा घ्याहो नारायणा । कृष्णा जगज्जीवना ।
विनविते रखुमाई । दासी होईन मी कान्हा ध्रु०
शांति हे नागवेली- । पानें घेऊनियां करीं ।
मीपण जाळुनीयां । चुना लावियेला वरी ॥ १ ॥
वासना फोडुनीयां । चूर्ण केली सुपारी ।
भावार्थ कापुरानें । घोळियेली निर्धारीं ॥ २ ॥
विवेकु हा कातरंग । रंगीं रंगला सुरंग ।
वैराग्य जायफळ । मिळविलें सकळ ॥ ३ ॥
दया हे जायपत्री । क्षमा लवंगा आणिल्या ।
सुबुद्धि वेलदोडे । शिवरामीं अर्पियेले ॥ ४ ॥
* माडो परमेश्वरगुरुव्याना । विडदिरुवदु भजना ।
नोडो नी निन्नोळु निजखूना । पूर्णैक्यद ज्ञाना
अपरूपद नरतनुविदु नोडो । शडगरदा पाडो ।
अपहास्यद माडदे नी कूडो । घनचिन्मय गूडो

अग्नीचक्रद वळियल्लि । एरडु कमलदल्लि ।
आज्ञा झँगिझगि सुव वेळकल्लि । तिळि निन्नोळ-
गिल्लि ॥ ३ ॥
मेलिन स्थानद सहस्रारा । गुरुतत्त्वदपूरा ।
घेळारोळुवल्लद सुखसारा । शंकरप दविवरा ॥
भीमा ॥ ४ ॥

---

## आरत्यां.

१ जय जया दासबोधा ग्रंथराजा प्रसिद्धा ।
आरती ओंवाळीन विमळज्ञान बाळबोधा ॥धृ०
वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला ।
श्रुतिशास्त्रग्रंथगीता साक्ष संगम केला ।
महानुभाव संतजनीं अनुभव चाखीला ।
अज्ञान जडजीवा मार्ग सुगम जाला ॥ १ ॥
नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी ।
चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी ।

हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी ।
वद्धचि सिद्ध झाले असंख्यात मानवी ॥ २ ॥

वीसहि दशकींचा अनुभव जो पाहे ।
नित्यनेम विवरीतां स्वयें ब्रह्मचि होये ।
अपार पुण्य गांठीं तरि श्रवण लाहे ।
कल्याण लेखकाचें भावगर्भ हृदयीं ॥ ३ ॥

सुख सहिता दुःख रहिता निर्मळ एकांता ।
कलिमलदहना गहना स्वामी समर्था ।
न कळे ब्रह्मादीकां अंत अनंता ।
तो तूं आम्हां सुलभ जय कृपावंता ॥ १ ॥

जयदेव जयदेव जय करुणाकरा ।
आरती ओंवाळूं सद्गुरु माहेरा ॥ ध्रु० ॥
मायेविण माहेर विश्रांती ठाव ।
शब्दीं अर्थलाभ बोलणें वाव ।
सद्गुरुप्रसाद सुलभ उपाव ।
रामीरामदासा कळला सद्भाव ॥ २ ॥

त्रिगुणात्मक त्रैमूर्ति दत्त हा जाणा ।
त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा ।
नेति नेति शब्द न ये अनुमाना ।
सुरवरमुनिजनयोगिसमाधि न ये ध्याना १

जयदेव जयदेव जय श्रीगुरुदत्ता ।
आरति ओंवाळितां हरसी भवचिंता । ध्रु०।
सबाह्य अभ्यंतरीं तूं एक दत्त ।
अभाग्यासी कैंची कळेल ही मात ।
पराहि परतली तेथें कैंचा हा हेत ।
जन्ममरणाचाही पुरलासे अंत ॥ २ ॥

दत्त येऊनीयां उभा ठाकला ।
भावें साष्टांगेंसीं प्रणिपात केला ।
प्रसन्न होऊनि आशीर्वाद दिधला ।
जन्ममरणाचा फेरा चुकविला ॥ ३ ॥
दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान ।
हरपलें मन झालें उन्मन ।

मीतूंपणाची झाली बोळवण ।
एकाजनार्दनीं श्रीदत्तध्यान ॥ ४ ॥
धन्य धन्य गुरूराव ।
माझे देहीं दाविला देव ॥ ध्रु० ॥
देहाचें देऊळ केलें ।
आत्मलिंग आंत स्थापिलें ॥ १ ॥
त्रिगुणाच्या वळिल्या वाती ।
निर्गुणाच्या लाविल्या ज्योती ॥ २ ॥
पंचप्राण पंचारती ।
मुक्ताबाई ओंवाळिती ॥ ३ ॥
जयजया काडासिद्धा आरति माडुवे सिद्धा ॥पल्ल॥
मुत्तिन आरतिगे बंगारद वत्ति ।
दिवीगि चंद्रदीप्ति बेळगुवे पूर्णभक्ति ॥ १ ॥
आरति माडूत प्रेमदिंद हाडुत ।
स्वामि ना निन्न दूता करुणा माडो कृपावंता २
आरतिगे मेच्चितानु वरव कूडालि वंदा ।
कृपादृष्टिगळिंदा तुळजाग सदानंदा ॥ ३ ॥

# शेजारती.

आतां स्वामी सुखें निद्रा करा अवधूता ।
नरसिंहसरस्वति अवधूता ।
चिन्मयसुखधामीं जाउनि पहुडा एकांता ॥ध्रु०॥
वैराग्याचा कुंचा घेउनि चौक झाडिला ।
तयावरी सप्रेमाचा शिडकावा केला ॥ १ ॥
पायघड्या घातल्या सुंदर नवविधा भक्ती ।
ज्ञानाच्या समया उजळुनि लाविल्या ज्योती २
भावार्थाचा मंचक हृदयाकाशीं टांगिला ।
मनाचीं सुमनें जोडुनि केलें शेजेला ॥ ३ ॥
द्वैताचें कपाट लावुनि एकत्र केलें ।
दुर्बुद्धीच्या गांठी सोडुनि पडदे सोडिले ॥ ४ ॥
आशातृष्णाकल्पनांचा सांडुनि गलबला ।
क्षमा दया शांती दासी उभ्या सेवेला ॥ ५ ॥
अलक्ष्य उन्मनिं घेउनि नाजुक दूशेला ।
निरंजनीं सद्गुरु माझा निजीं निजेला ॥ ६ ॥

